काशी नरेश त्रिविक्रमसिंहच्या देहात मच्छिंद्रनाथांचे अस्तित्व फक्त बारा वर्षांच्या कालावधीसाठीच होते आणि तो काळ संपण्याआधी तिथे गेले पाहिजे, या जाणीवेतून गोरक्षनाथ तीर्थयात्रेहून परतत आहेत. मार्गात एक आडवे बोलण्याचा दुर्गुण असणाऱ्या माणिक नामक शेतकऱ्याला त्याच्या दुर्गुणांचाच उपयोग करून त्याला तपश्चर्येस बसविले. काशी नगरीत जाण्यापूर्वी कैलाश पर्वतावरील बद्रिकाश्रम परिसरात चौरंगीला सुद्धा त्याच्या तपा मधून मुक्त केले आणि नाथपंथीयासाठी आवश्यक त्या शस्त्रअस्त्र विद्यांचे सखोल शिक्षण दिले. त्यानंतर चौरंगीच्या पित्याचे मुलाविषयीचे गैरसमज दूर करून चौरंगीच्या सावत्र मातेला शासन करविले. त्यानंतर काशी नगरीत आल्यावर मात्र त्यांना जो धक्का बसला त्यातून सावरण्यासाठी फार प्रयास करावे लागले. शिवालयातील गुप्त गुहेत ठेवलेला मच्छिंद्रनाथांचा देहाच गायब झाला होता. तो देह मिळविण्यासाठी घनघोर रणकंदन करावे लागले. यापुढील कथासारही असाच रोमांचक आहे...

गोरक्षनाथ आणि चौरंगीनाथ यांनी शौर्याची परिसीमा केली आणि गुरदेव मच्छिंद्रनाथांचा देह परत मिळविला, त्यासाठी महाभयंकर रणकंदन झाले आणि साक्षात श्रीविष्णूंना संग्रामस्थानी येऊन हस्तक्षेप करावा लागला, हे रणकंदन थांबवितांना शिवपुत्र वीरभद्राचा ही मृत्यु झाला. गोराक्षांनी संजिवनी अस्त्राने निर्माण केलेल्या दानवांसह वीरभद्रही जळून भस्म झाल्याने श्रीशिव अत्यंत शोकाकुल झाले. ते त्याचे गुण आठवून दुःखवेगात स्फुंदत शोक करीत आहेत, उघडपणे काही बोलत नाहीत पण अंतरंगात मात्र उमाळ्यांचे कढ दाबून ठेवणे अशक्य झाले आहे. त्याची परिणीती म्हणजे आश्रू नेत्रातून ठिबकू लागले आहेत. “वीरभद्रा!! माझ्या शक्तिमान पुत्रा; तू सर्व शस्त्रअस्त्र विद्येचा महासिंधू होतास, असा शूरवीर पुत्र अकाली जाणे हे माझे दुर्भाग्य... अपार शिवगणांची त्याबरोबर तुलना करता येणार नाही. नभांगणात चंद्र नसेल तर असंख्य तारका काय उपयोगाच्या? वीरभद्राच्या पराक्रम तेजापुढे सर्व निस्तेज वाटत आहे. देखण्या चेहऱ्या मोहऱ्याला केवळ नाकामुळे कुरूपता यावी, तशी विद्रुपता वीरभद्राच्या जाण्याने निर्माण झाली आहे. माझा प्राणप्रिय पुत्र मला सोडून गेला...ss” दंतपंक्तीखाली ओठ दाबून हुंदका रोखण्याचा प्रयत्न करीत श्रीशिव गद्‌गद्‌त आहेत. हंबरडे फोडणे नाही, आक्रोशाचा ध्वनी नाही, आरडओरड नाही, तरीही चेहऱ्यावरचे हावभाव, गात्र नि गात्र शोकामुळे देह थरथरत आहे. एका दुःखी पित्याचा शोक केवळ देहबोलीतून व्यक्त होत होता.

श्रीशिवाची ती अवस्था पाहून गोरक्षनाथांचे ह्रदय हेलावले, ते मनात म्हणाले, “श्री महादेवांच्या दुःखास मीच कारणीभूत आहे. गुरु मच्छिंद्रनाथ जेव्हा मला बद्रीकाश्रमात तपला बसवून गेले तेव्हा या दयाळाने माझ्यासाठी रात्रंदिवस कष्ट उपसले. आईसारखा लळा लावला आणि ममतेचे छत्र माझ्यावर पांघरले होते. असा हा भोळा देव, माझ्यामुळे दुखावला गेला. त्यांचा पुत्र माझ्या हातून ठार झाला. उपकारकर्त्याला संकटात टाकून मी अपकार केला आहे. त्रिलोक ज्याच्या चरणी लीन होते, त्यालाच मी दीनवाणे केले आहे. अरेरे! मी कृतघ्न, पापी आहे.” अशा विचारांनी दुःखी होऊन गोरक्ष श्रीशिवाच्या चरणी लागून म्हणाले, “महादेवा! मुलाच्या मृत्यूने तुम्ही दुःखी आहात पण आपण निश्चिंत असावे, मी वीरभद्राला पुन्हा उठवितो. युद्धभूमीवर वीरभद्रासमवेत दानवांच्याही अस्थी विखुरलेल्या असून, त्यापैकी वीरभद्राच्या कोणत्या ते ओळखणे कठीण आहे. त्याला सजीव करण्याच्या नादात चुकून दानव उठतील म्हणून काळजी वाटते. आपण जर त्याच्या अस्थी अचूक ओळखून आणल्या तर मी त्याला सजीव करेन.” यावर श्रीशिव म्हणाले, “जती गोरक्षा! वीरभद्राच्या सर्व अस्थी मी शोधून काढू शकतो, त्याचे कारणही सांगतो, माझे शिवगण आसनी, शयनी, भोजनी, काया, वाचा, चित्तबुद्धीने माझ्या नामाचा अखंड जप करतात पण माझा वीरभद्र; चित्त, बुद्धी अंतकरण,

जागेपणीच नव्हे तर सुप्त स्वप्नावस्थेत सुद्धा माझा अखंड जप करीत असे." असे म्हणून ते रणभूमीवर गेले. चित्तभस्म तुडवीत एक एक अस्थी उचलून कानाला लावून ऐकून फेकू लागले. अशा प्रकारे शोध घेत घेत ज्या ठिकाणी वीरभद्र भस्म झाला होता, त्या स्थानी पोहोचले. अस्थी उचलून कानाला लावली असतां, त्यातून मंद स्वरांत शब्दध्वनी निनादत होते. "हे शिव, हे शिव, हे शिव!!" असा शब्दोच्चार करणाऱ्या सर्व अस्थी त्यांनी गोळा केल्या आणि गोरक्षापुढे आणून ठेवल्या. त्यानंतर मात्र चमत्कारच घडला. विद्यार्णवकेसरी गुरु गोरक्षनाथांनी वीरभद्राच्या नावाने संजीवनी मंत्राचा जप करीत भस्म अस्थींवर फुंकताच देहधारी वीरभद्र उठून बसला. झोपेतून जागे व्हावे तसे म्हणू लागला, "माझे धनुष्यबाण कुठे आहेत? सत्वर द्या. अगणित दानव प्रकट झाले आहेत. त्यांचा निःपात करून, गोरक्षाला यमपुरीत धाडावयाचे आहे. माझा प्रताप पाहाच आता." त्याचा हात धरून श्रीशिव म्हणाले, "पुत्रा! जरा शांत हो, व्यर्थ भाष्य करू नकोस." मग प्रेमाने त्यास जवळ बसविले आणि सर्व घटनांची माहिती कथन केली आणि शेवटी म्हणाले, "गोरक्षनाथाबरोबर तसेच सर्व नाथपंथीयाबरोबर स्नेह भाव वाढवावा. त्यांत कल्याण आहे." त्याची गोरक्षाबरोबर गळाभेट करावयास लावली आणि समेट घडवून आणला. चौरंगीनाथांच्या मोहनास्त्राने मोहित आणि वातास्त्राने भिरभिरत असलेले बहात्तर कोटी चौऱ्याऐंशी लक्ष शिवगणांस गोराक्षांनी भूमीवर उतरविले. त्या सर्वांनी गुरु गोराक्षनाथांना आणि चौरंगीनाथांना वंदन केले व स्वस्थानी परतले.

गुरु मच्छिंद्रनाथांच्या देहाचे तुकडे घेऊन गोरक्ष आणि चौरंगी शिवालयातील गुप्त गुहेत जाऊन संरक्षण करीत बसले. महाराज त्रिविक्रम शिवालयात दर्शनासाठी आले. गोराक्षांना पाहून त्यांना खूप आनंद झाला, जवळ बसवून ख्याली खुशालीची चौकशी केली. त्यावेळी गोराक्षांनी त्यांच्या देहाची राणीकडून झालेली उपेक्षा, त्यानंतर श्रीशिव आणि अंबामाते कडून झालेली तत्पर कार्यवाही आणि वीरभद्राची दांडगाई अशी इत्यंभूत हकीकत सांगितली. ती ऐकून गुरुदेव हळहळले आणि म्हणाले, "गोरक्षा! काही दिवस धीर धरावा. धर्मनाथाला राजसिंहासनावर बसवूनच मी स्वदेही परत येईन."

त्यानंतर एकेदिवशी काशीनरेश त्रिविक्रमांनी मंत्री मंडळाची सभा बोलवून धर्मनाथाच्या राज्याभिषेकाचा विषय मांडला. सर्वांचा होकार प्राप्त करून एका शुभमुहूर्तावर देशोदेशीच्या राजांच्या उपस्थितीत धर्मनाथाचा राज्याभिषेक करण्यात आला. 'काशीराज धर्मनाथ' म्हणून सर्वत्र द्वाही फिरविण्यात आली. याचकांना अपार धनदान देऊन संतुष्ट करण्यात आले. अतिथी म्हणून आलेल्या राजे महाराजांचे वास्त्रेभूषणे आणि स्मृतीचिन्हे देऊन सत्कार करण्यात आला. या शुभप्रसंगी बंदीगृहातील कैद्यांची शिक्षा माफ करण्यात आली आणि त्यांना मुक्त करण्यात आले. सर्वत्र आनंदीआनंद साजरा होत होता. तहत बारा वर्षे त्रिविक्रमाच्या देहात वास करून गुरुनाथांनी राज्याचा वारस नियुक्त केला होता. त्यानंतर एक महिन्यांनी आपल्या महालात त्रिविक्रमाच्या देहाचा त्याग करून महाराज मच्छिंद्र शिवालयात गेले. रेवती राणी काही कामानिमित्त महालात जाऊन त्रिविक्रमांना पहुडलेले पाहून विचारते, "स्वामी, आज एवढ्या उशिरापर्यंत का झोपले आहेत? प्रकृती बरी नाहीय का? राजवैद्यांना बोलावणे पाठवू का? परंतु काहीच प्रतिसाद न मिळाल्याने तिने त्यांना हाताने हलविले आणि तिला अचेतन कलेवर असल्याचे जाणविले, महाराणीने घाबरून हंबरडा फोडला, अतोनात शोक करू लागली. ते ऐकून राजकुमार धर्मनाथासह मंत्री, संत्री, सेवक प्रजाजन धावले. प्रचंड आकांत उठला. कर्णोपकर्णी हे वृत्त शिवालयात गोरक्षापर्यंत पोहोचले. मग त्यांनी गुहेत जाऊन संजीवनी मंत्र प्रयोगाने विभक्त देहावशेषांचा पूर्वीप्रमाणे एकसंध देह निर्माण केला. मच्छिंद्रनाथांच्या आत्म्याने कुडीत प्रवेश करताच सजीव महाराज क्षणात उठून बसले. गोरक्ष आणि चौरंगीने त्यांचे दर्शन घेतले.

त्या शिवालया नजीकच्या स्मशानात बारा वर्षांपूर्वी जेथे काशीनरेश त्रिविक्रमाची प्रेतयात्रा आली होती, त्याचठिकाणी आता पुन्हा प्रेतयात्रा आली आहे. त्या अंतयात्रेत तिन्ही नाथ सामील झाले होते. त्यांना पाहून रेवती काय समजायचे ते समजली. राजाच्या मृत देहाला अग्नी लावून सर्वजण परतले. सर्वांनी आपआपल्या मनाची समजूत घातली आणि दुःखाचे कडू घोट गिळून नित्याचे व्यवहार सुरु केले. तथापि राजकुमार धर्मनाथाच्या मनाची तगमग शांत होत नव्हती, तो तर दारूण शोक व्यक्त करीत राही. असंख्य वडिलधाऱ्यांनी त्याचे सांत्वन केले पण त्याची शोकमग्नता काही कमी होत नव्हती. राजाची उत्तरक्रिया झाली, तरी याच्या शोकात खंड पडला नाही, त्याने तर अन्नपाणी वर्ज्य केले आणि प्राणत्याग करायची तयारी सुरु केली. प्राणोत्क्रमण होण्याचा प्रसंग निर्माण झाला. त्यावेळी मातृहृदय ममतेने दोलायमान झाले. एक दिवस तिने त्याला एकांती नेले आणि म्हणाली, "पुत्र धर्मणाथ!! तुझ्या तातश्रींचे महानिर्वाण झाले असे समजून तू शोक करू नको, तुझे तात या भूमीवर चिरंजीव आहेत. त्यांचे नाव जती मच्छिंद्रनाथ असे आहे. ते शिवालयात आहेत, जा त्यांना प्रत्यक्ष भेटून ये." मग तिने देह प्रवेशाची सर्व कहाणी त्याला कथन केली. ते ऐकून धर्मनाथ शिवालयात गेला. मच्छिंद्रांना नमन जरून सर्वांना राजमहालात आणून एक वर्षभर ठेवून घेतले. उत्तम सेवा रुजू केली. एका वर्षानंतर पुन्हा जेव्हा नाथ जाण्यास निघाले तेव्हा धर्मनाथ पुन्हा शोकाकुल झाला आणि त्यांच्याबारोबर जाण्याचा आग्रह धरू लागला. तेव्हा पिताश्री म्हणाले, "पुत्रा! आम्ही बारा वर्षांनी पुन्हा परत येऊ, तेव्हा तुला गोरक्षनाथ दीक्षा देऊन स्वतः बरोबर घेऊन जातील. तोपर्यंत मातेची सेवा करून राज्यकारभाराचा सांभाळ करावा. रेवती माझा प्राण आहे, तिची सेवा केल्यास मला परम आनंद होईल. तिला कदापि दुःख देऊ नकोस." अशा प्रकारे समजूत काढून तिन्ही नाथांनी तीर्थाटनाचा मार्ग धरला.

तिन्ही नाथ तीर्थयात्रा करीत गोदाकाठच्या भामा नगरानजीकच्या अरण्यात पोहोचले. गोराक्षांना माणिकचे स्मरण झाले. मग त्याची आडमुठी कथाही त्याने मच्छिंद्रनाथांना सांगितली. गुरुजींनी त्याला भेटण्याची इच्छा व्यक्त केली. सर्वजण त्याच्या शेताच्या रोखाने निघाले. जवळ जाऊन पाहतात तर, माणिक लकडासारखा वाळून, सुकून उभा आहे. डोक्यावर दोरखंड येठणाचे ओझे, केसांच्या वाढलेल्या जटा, नखांच्या जुळमट चुंबळी वळलेल्या, पाठ पोट, अस्थी, त्वचा एक झालेले. तिळभर मांस देहावर उरले नव्हते. एकाग्र चित्ताने देहभान हरपून जप करीत होता. गोरक्षनाथ मनाशी म्हणाले, "धन्य आहे! हा खरोखरीचा माणिक निघाला." मग त्यांनी गुरुजींना सांगितले, "गुरुनाथा! हाच अडबंग." मग तिन्ही नाथ त्याच्या अतिजवळ गेले. मच्छिंद्रनाथ म्हणाले, "तपस्वी महाराज! आता तप थांबावे.' तो म्हणाला, "कशाबद्दल? तुमचे त्यात काय जाते? आपले काम आठवा आणि पुढचा रस्ता धरा, नसत्या उचापती कशाला करता? निघा येथून!!" मच्छिंद्रनाथ जे काही विचारीत त्यांना हा वाकडी उत्तरे देत होता. मग गोरक्षांनी नाथांना बाजूला घेऊन संगीतले, "महाराज, हा आडव्या डोक्याचा अडबंग आहे, सरळ बोलून ऐकत नाही, उलट्या वक्तव्याने युक्तीपूर्वक मी ह्याचे हित करतो, आपण शांतपणे त्या झाडाखाली बसून आराम करावा. मच्छिंद्रनाथ आणि चौरंगी सावलीत बसून त्याची गंमत पाहून निखळपणे हसत होते. गोरक्षनाथ त्याच्या जवळ गेले आणि त्याच्याभोवती गोल प्रदक्षिणा घालीत म्हणाले, "अहाहा!! असा तपस्वी आम्ही कधी पहिला नव्हता, समुद्रवलयांकित सर्व भूमी फिरलो, परंतु असा आगळा तपोनाथ पाहण्यात आला नाही. अशा योगमुनीचा अनुग्रह प्राप्त झाल्यास, असा गुरु मिळाला तर मी स्वतःला भाग्यशाली समजेन. स्वामी! माझ्यावर कृपा करा आणि माझे गुरु व्हा." अडबंग म्हणाला, "बेट्या! एवढा मोठा घोडा झाला आहेस आणि आता मला गुरु करून घायचे म्हणतोस? अरे, तूच माझा गुरु का होत नाहीस? हो माझा गुरु."

याच संधीची वाट पाहत असलेल्या गुरु गोराक्षांनी पटकन त्याच्या कानात गुरुमंत्र सांगून कान फुंकले. त्याला सज्ञानी ब्रम्हज्ञानी केले. माणिक तर मंत्रमुग्धच झाला. मंत्रप्रभावाने अज्ञानाची काळोखी नष्ट झाली आणि सर्वत्र ब्रम्हचैतन्य भरल्याचे दिसू लागले. ज्ञानदृष्टी प्राप्त झाल्याने तो गुरु गोराक्षांच्या चरणांवर ओणवा झाला, तेव्हा गोरक्ष हसत म्हणाले, “याला ‘अडबंग’ हेच नाव शोभून दिसते. आजपासून याच नावाने याला साद घालू या.” मग गोराक्षांनी त्याला नाथदीक्षा दिली आणि सोबत घेऊन तीर्थयात्रेसाठी निघाले. प्रवासात आणि मुक्कामी असतांना सर्व अस्त्र, शस्त्र, विद्याभ्यास शिकवून त्यास पारंगत केले. चौघे नाथ बारा वर्षे तीर्थाटन करून पुन्हा काशी नगरीस आले. काशी नगरीमध्ये आनंद साजरा होत होता कारण काशीनरेश धर्मनाथाला पुत्र प्राप्ती झाली होती. त्याचे नाव त्रिविक्रम राजाची स्मृती म्हणून ‘त्रिविक्रम’ हेच ठेवले. चौघे नाथ येत असल्याचे कळताच धर्मनाथ स्वतः त्यांच्या स्वागतासाठी सामोरा गेला. नाथ मंडळीना आदरपूर्वक राजवाड्यात घेऊन आला. भक्ती आणि आतिथ्य सेवेने त्यांची मने जिंकून घेतली. त्यांच्या सल्ल्यानुसार; स्वपुत्र त्रिविक्रमास राजगादीवर बसवून स्वतः नाथपंथी दीक्षा घेतली. तो दिवस माघ शुद्ध द्वितीयेचा होता म्हणून आजतागयात त्या तिथीला ‘धर्मराज बीज’ म्हणून ओळखतात. गुरु गोरक्षांनी त्याला अनुग्रह दिला तेव्हा सर्व प्रजाजनांसह स्वर्गीय देव सुद्धा उपस्थित होते. अनुग्रह समारंभानंतर सर्वजण भोजनासाठी एकत्र बसले. गुरु गोराक्षांनी स्वहस्ते सर्वांना घास भरविले. अलौकिक प्रसादाने सकलांना संतुष्ट केले. तेव्हा सर्वांनी नाथांना प्रेमळ विनंती केली, “जन्मो जन्मी प्रतिवर्षी असा प्रसाद प्राप्त व्हावा अशी इच्छा आहे.” तेव्हा गोरक्ष म्हणाले, “प्रतिवर्षी माघ शुद्ध द्वितीयेला माझे नाव घेऊन जो कुणी ‘धर्मराज बीज’ हा उत्सव भक्तीभावाने साजरा करील, यथाशक्ती अन्नदान करील त्याच्यावर मी सदा प्रसन्न असेन. त्या भाविकाच्या घरातील गृहदोष, रोगादी भोग, आकस्मिक विघ्ने, संकटे, अभद्र स्वप्ने, इत्यादी पिंडाचा नाश होईल. घरामध्ये सुख, शांती, आरोग्य, धनसंपदा नांदेल, मनोकामना पूर्ण होतील.” असे अभिवचन दिले.

त्यानंतर धर्मनाथाला आपल्यासमवेत घेऊन हे पाच नरशार्दुल तीर्थक्षेत्रात भ्रमंती करू लागले. धर्मनाथाला सर्व अस्त्रशस्त्र विद्यांत पारंगत करून शेवटी त्याला बद्रीकाश्रमात नेऊन बारा वर्षांसाठी तपाला बसविले. तेथून चौघे नाथ पुन्हा तीर्थयात्रेला निघून गेले. बारा वर्षांनी बद्रीकाश्रमी येऊन पोहोचले, धर्मनाथाच्या तपाची सांगता केली. सर्व देवदेवतांना बोलावून आशीर्वादांची प्राप्ती करून दिली. त्याला समवेत घेऊन पाचही नाथ पुनश्च भ्रमंतीस गेले.

भाविकांना, श्रोत्यांना आणि वाचकांना रेवणनाथांची कथा सांगण्यासाठी ग्रंथकर्ते सज्ज झाले आहेत. पूर्व कथनानुसार रेवानदीच्या रेतीत ब्रम्हवीर्य पडले होते. त्यामध्ये चमननारायणाने प्रेवेश करताच देहधारी बालक जन्माला येऊन रुदन करू लागले. त्या अरण्याव्याप्त प्रदेशातील वनशेतीत काम करणारा सहनसारूक नामक शेतकरी पाण्याची घागर घेऊन नदीवर आला असता, कर्दळीच्या गाभ्यासारखा सुकुमार बाळ त्याला दिसले. हातातील घागर खाली ठेवून त्याने बाळाला मायेने उचलून घेतले. छातीशी धरून कुरवाळले. मुखचुंबन घेतले. नदी डोहातील पाण्याने घागर भरली व थेट घरी गेला.

अत्यानंदाने पत्नीला साद घातली, “अग उत्तमा!!... आज सोन्याचा दिवस उगविला आहे. पाणी आणण्यासाठी सहज रेवा नदीकाठी गेलो असतांना दैवी कृपेने हे बाळ सापडले, ईश्वरानेच आपल्या वंशाला आधारस्तंभ दिला आहे. उत्तमा उत्सुकतेने आणि आश्चर्याने म्हणाली, “कुठे आहे? मला पाहू द्या.” वस्त्रांत गुंडाळलेले बालक त्याने तिच्या हातात दिले. बाळाला पाहून सागराला उधाण यावे तसे तिच्या मातृह्रदयाला आनंदाचे भरते आले. बाळाला ह्रदयाशी कवटाळून पटापटा त्याचे मुके घेतले. त्याची टाळू भरून त्याला गरम पाण्याने स्नान घातले. मऊ वस्त्रांच्या बाळोत्यांत गुंडाळून

त्याला स्तनपान करविले आणि पाळण्यात तिच्या तान्हुल्या शेजारी यालाही ठेवून झोका देत अंगीई गाऊ लागली, स्वतःच्या आपत्याबरोबर याचाही सांभाळ करू लागली. हे बाळ रेवानदीच्या तीरावरील रेतीत सापडले म्हणून त्याचे नाव 'रेवण' असे ठेवण्यात आले. पाहता पाहता रेवण बारा वर्षांचा झाला. सहनसारूकाने त्याला शेतीची सर्व कामे शिकविली. नांगरणी, कुळवणी, पेरणी, खुरपणी, कापणी, पाणी देण्यात आणि राखण करण्यात रेवण पारंगत झाला. एके दिवशी नेहमीप्रमाणे रेवण भल्या पाहटे बैलांना घेऊन शेताकडे निघाला. रुपेरी चांदण्यांत शेताची वाट स्पष्टपणे दिसत होती. बैलांच्या गळयातील घुंगरांचा लयबद्ध नाद निनादत होता आणि त्या नादातच 'अरं ढवळ्या ss, अरं पवळ्या' असा रेवणचा बैलांना हकारा, मंगलमय वातावरणाची निर्मिती करीत होता. त्याच रस्त्याने गिरनार पर्वताकडे श्री दत्तमहाराज निघाले होते. पायात खडावा, देहावर वस्त्र पांघरलेले, शुभ्र कौपीन, हातात कमंडलू, रुद्राक्षमाला, खांद्यावर झोळी, पिंगट दाढी मिशा, मानेवर रुळणारा विपुल केशसंभार, सुवर्णासारखी लखलखणारी केतकी वर्णाची तेजस्वी कांती, असा ज्ञानीयांचा राजा, गुरूंचाही गुरु, त्रिदेवांचा अवतार, अत्रीनंदन श्री दत्त लगबगीने चालले असतांना बैलांच्या आड असलेला बाळ रेवण त्यांना दिसला नाही, बैल अचानक बुजला आणि उधळत पुढे पळाला आणि रेवण श्रीदत्तगुरु उभयंता एकमेकांवर आदळले. कदाचित ती परमेश्वरी योजनाच असावी कारण केवळ त्या दिव्य स्पर्शाने रेवण ज्ञानी झाला. त्याला पूर्वजन्माचे स्मरण झाले. या जन्मातील अवताराची जाणीव झाली. मनावरील अज्ञानाचे माया पटल दूर झाले. धडक बसताच श्रीदत्तगुरूंनी विचारले, "तू कोण आहेस बाळा? बाळ रेवणने वंदन करून नम्रतेने उत्तर दिले, "गुरुदेव! या देहात आपलाच अंश आहे. सत्व, रज, तम गुणी त्रिदेवांचे आपण अवतार असून, त्यापैकी सत्वगुणी महापुरुषाचा मी अंश आहे. अज्ञानाच्या भोवऱ्यात सापडून मी फार कष्टी झालो असून, आता दयाळू भावनेने सनाथ करून कल्याण करावे. आपण मला सनाथ केल्याशिवाय हे पवित्र चरण मी सोडणार आही." असे म्हणून त्यांच्या पायाला मिठी मारली. त्याची भक्ती, आदरभाव आणि वक्तृत्व पाहून श्रीदत्तांची ममता दाटून आली. हातातील कमंडलू खाली ठेवून त्याच्या माथ्यावार हात ठेवला. त्याला उठवीत मनाशी म्हणाले, "हा मुळातच सनाथ आहे, चमसनारायण अवतार आहे 'रेवणनाथ' म्हणून नवनाथांतविख्यात होणार आहे. याला अनुग्रह देऊन नाथपंथीयांची किर्ती वाढवायची आहेच, परंतु सध्या याचे बालवय आहे, तसेच याच्या हातून भक्तीचे कष्ट घडले नाहीत, काहीतरी प्रायश्चित घडल्याशिवाय विरक्ती येत नाही. भक्ती घडत नाही. तोपर्यंत उपदेश पटत नाही. तपश्चर्येशिवाय ब्रम्हस्थिती प्राप्त होत नाही." असा विचार करून त्यांनी त्याच्या डोक्यावर हात ठेवून आशीर्वाद दिला परंतु अनुग्रह दिला नाही, त्याला भक्तीमार्गाला लावण्यासाठी एक सिद्धी देऊन त्याचे बीजारोपण केले. सिद्धीप्राप्तीने आनंदित झालेल्या रेवणने त्यांचे दर्शन घेतले. त्याचा निरोप घेऊन श्रीदत्त गिरनार पर्वताकडे निघून गेले.

पण केवळ एका सिद्धीने संतुष्ट होऊन रेवण हिताला चुकला होता. कोंड्याचा रोट आणि कांजी दिली की भूत संतुष्ट होते, तसे त्याने अल्प सिद्धीवर तृप्त व्हावयास नको होते. खापरासाठी चिंतामणी सोडला. मदिराच्या नशेला भुलून अमृत कुंभ सोडून द्यावा किंवा गारगोटीच्या चमकेला भुलून हिरा फेकून द्यावा तसा मूढपणा घडला होता. दैवयोगाने उत्कृष्ट संधी आली होती पण अज्ञानाने दुरावली.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने कार्यसिद्धी होऊन यश मिळते.